**आकाशवाणी नागपूर,**

**प्रादेशिक वृत्त विभाग**

**प्रादेशिक बातम्या (मराठी - वेळ सायंकाळी ६.४०)**

**मंगळवार , दिनांक 8 सप्टेंबर 2020**

**आकाशवाणी नागपूर**

**राम औरंगाबाद्कर आपल्याला प्रादेशिक बातम्या देत आहे**

**काही ठळक बातम्या....**

1. रिपब्लिक टीव्हीचे संचालक अर्णब गोस्वामी यांच्या विरोधात शिवसेना आमदाराचा आज विधानसभेत हक्कभंग प्रस्ताव दाखल
2. राज्यातील आरोग्य विज्ञान पदवी प्रवेश प्रक्रियेत, 'वन महाराष्ट्र, वन मेरिट', वैद्यकीय शिक्षण मंत्री अमित देशमुख याचि विधानसभेत घोषणा
3. विधानपरिषदेच्या उपसभापतीपदी नीलम गोऱ्हे यांची आज एकमतानं निवड
4. कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाचा **नववा** दीक्षांत समारंभ आज संपन्न

---

रिपब्लिक टीव्हीचे संचालक अर्णब गोस्वामी यांच्याविरोधात शिवसेना आमदार प्रताप सरनाईक यांनी आज विधानसभेत हक्कभंग प्रस्ताव दाखल केला. अर्णब गोस्वामी यांनी त्यांच्या वृत्तवाहिनीच्या माध्यमातून, सातत्यानं राज्याचे प्रमुख आणि सरकार यांच्याविरोधात एकांगी विधानं करून शासनाची प्रतिमा मलिन करण्याचा प्रयत्न चालवल्याबद्दल हा हक्कभंग प्रस्ताव दाखल करण्यात आला आहे.

विधानसभा उपाध्यक्ष नरहरी झिरवळ यांनी हक्कभंग प्रस्ताव दाखल करून घेतला आणि नियमानुसार कारवाई करण्याची सूचना केली. यामुळे मंत्री आणि

विरोधकांमध्ये शाब्दिक चकमक होऊन कामकाज आज तीनदा तहकूब झालं.

अभिनेत्री कंगना राणावत आणि रिपब्लिक वृत्तवाहिनीचे संचालक अर्णब गोस्वामी यांच्या विरोधात आज विधान परिषदेत हक्कभंग प्रस्तावाची सूचना मांडण्यात आली. राणावत हिच्या विरोधात काँग्रेसचे भाई जगताप यांनी तर गोस्वामी यांच्या विरोधात शिवसेनेच्या मनीषा कायंदे यांनी हक्कभंग प्रस्ताव मांडला.

सभापती रामराजे नाईक निंबाळकर यांनी या सूचना स्वीकारल्या असून यावर नंतर निर्णय देणार असल्याचं जाहीर केलं. अनेकांच्या बलिदानातून मिळालेल्या मुंबईचा अपमान करून कंगनानं मुंबईशी गद्दारी केली आहे अशी टीका जगताप यांनी हा हक्कभंग प्रस्ताव मांडताना केली.

---------------------------------------------

सत्तारूढ सदस्य जाणूनबुजून चर्चा टाळत असून, राज्यात पूर आला, कोकणात चक्रीवादळ आलं आणि कोविडनं लोक मरत आहेत मात्र सरकार गंभीर नाही असा आरोप विरोधी पक्षनेते देवेंद्र फडणवीस यांनी विधानसभेत पुरवणी मागण्यावरील चर्चेदरम्यान केला. चर्चा सुरु करायला वेळ झाल्यामुळे चर्चेची वेळ वाढवण्याची मागणीही त्यांनी केली.

जुलैपासून राज्यात कोविडचे नवे हॉटस्पॉट तयार झाले असून, सर्वत्र भयावह स्थिती असल्याचं सांगत सरकार आरोग्य कर्मचाऱ्यांची काळजी घेऊ शकत नाही तर सर्वसामान्यांचं काय होईल, असं ते म्हणाले.

कोविडमध्ये आपले राज्य पहिल्या क्रमांकावर असून, मुंबईतली सरकारनं जाहीर केलेली मृतांची आकडेवारी खोटी आहे असा आरोप करत, मृत्यू लपवून सरकार या रोगाचा मुकाबला कसा करणार असा सवाल त्यांनी केला. कोरोनासंदर्भात सरकारचे अनेक निर्णय चुकल्याचे तसंच सरकारचा खासगी रुग्णालयांवर कोणताही वचक राहिला नसल्याचं ते म्हणाले.

राज्यात कोरोना काळात शेतकऱ्यांना बोगस बियाणी मिळाली. सोयाबीनची पेरणी पूर्ण किडीमुळे वाया गेली. कापूस , उडीद , कडधान्य ही त्याच स्थितीत असताना सरकारनं त्याची दखल घेत नसल्याचा आरोप त्यांनी यावेळी केला.

---------------------------------------------

**मानवी शरीरात कोरोना विषाणूच्या अँटिबॉडी अर्थात प्रतिपिंड आढळणं ही, संबंधित व्यक्तीला कोरोना विषाणू संसर्ग होऊन गेल्याची खूण आहे, मात्र यामुळे कोरोना विषाणूच्या संसर्गापासून संरक्षण मिळेलच, असा निष्कर्ष काढता येत नाही, असं शास्त्रज्ञांनी म्हटलं आहे. ही प्रतिपिंड दोन प्रकारची असतात, सामान्य प्रकारची प्रतिपिंडं कोरोना विषाणूच्या संसर्गाला प्रतिबंध करू शकत नाहीत, असं पुण्याच्या राष्ट्रीय विज्ञान संस्थेतल्या शास्त्रज्ञ विनिता बाळ यांनी स्पष्ट केलं आहे.**

---------------------------------------------

देशभरात आज सकाळी ८ वाजता संपलेल्या चोवीस तासांत ७५ हजार ५२१ रुग्ण कोरोनामुक्त झाले. ही आजवर एकाच दिवसात कोरोनामुक्त झालेल्या रुग्णांची सर्वाधिक संख्या आहे. यामुळे कोरोनामुक्त झालेल्या देशभरातल्या एकूण रुग्णांची संख्या ३३ लाख २३ हजार ९५० झाली आहे. याबरोबरच देशातला कोरोनाबाधित रुग्ण बरे होण्याचा दर वाढून ७७ पूर्णांक ६५ शतांश टक्के झाला आहे.

याच काळात देशभरात ७५ हजार ८०९ कोरोनाबाधित रुग्णांचीही नोंद झाली. सध्या देशभरातल्या कोरोनाबाधितांची एकूण संख्या ४२ लाख ८० हजार ४२३ झाली आहे. देशभरात काल १ हजार १३३ रुग्णांचा कोरोनामुळे मृत्यू झाल्यानं,

मृतांची एकूण संख्या ७२ हजार ७७५ झाली आहे. सध्या देशभरात ८ लाख ८३ हजार ६९७ कोरोनाबाधित रुग्णांवर उपचार सुरु आहेत.

---------------------------------------------

**पालघर जिल्हयातल्या डहाणू, तलासरी, धुंदलवाडी परिसरात आज पुन्हा भूकंपाचे सौम्य धक्के जाणवले. रात्री बारा वाजता जाणवलेला पहिला धक्का तीन पूर्णांक एक दशांश रिश्टर स्केल तीव्रतेचा होता, दुसरा धक्का आज सकाळी ९ वाजून ५० मिनिटांनी तर तिसरा धक्का सव्वा दहा वाजता जाणवल्याचं आमच्या वार्ताहरानं कळवलं आहे**

---------------------------------------------

विधानपरिषदेच्या उपसभापतीपदी नीलम गोऱ्हे यांची आज एकमतानं निवड करण्यात आली. सभापती रामराजे नाईक निंबाळकर यांनी सभागृहात याबाबतची घोषणा केली. उपसभापती पदाच्या निवडणुकीसाठी महाविकास आघाडीकडून नीलम गोऱ्हे आणि भाजपकडून भाई गिरकर रिंगणात होते.

कोरोनाच्या पार्श्वभूमीवर होणाऱ्या या अधिवेशनात अनेक सदस्यांना उपस्थित राहता आले नाही त्यामुळे निवडणूक पुढे ढकलण्याची मागणी विरोधकांनी केली होती. याच मागणीसाठी भाजपानं मुंबई उच्च न्यायालयात याचिका दाखल केली असहे. त्यावर गुरूवारी सुनावणी असल्यानं आज ही निवडणूक आज घेऊ नये अशी मागणी विरोधी पक्षनेते प्रवीण दरेकर यांनी निवडणूक पुकारल्यानंतर केली.

मात्र उच्च न्यायालयानं आपल्याला याबद्दल काहीही कळवलेलं नाही. या निवडणुकीशी उच्च न्यायालयाचा संबंध नाही. जेव्हा विषय येईल तेव्हा न्यायालयात उत्तर देऊ असं सांगत सभापती निंबाळकर यांनी दरेकर यांची मागणी फेटाळून

लावत निवडणुकीचा कार्यक्रम पुकारला. यावर विरोधकांनी सभात्याग केला त्यामुळे भाई गिरकर यांच्या नावाचा प्रस्ताव भाजप सदस्यांना मांडता नाही आणि नीलम गोऱ्हे यांच्या नावाचा प्रस्ताव एकमतानं मंजूर झाला.

गोऱ्हे यांची उपसभापती पदी निवड झाल्याबद्दल मुख्यमंत्री उद्धव ठाकरे तसंच उपमुख्यमंत्री आणि सभागृह नेते अजित पवार यांनी त्यांचं अभिनंदन केलं.

---------------------------------------------

कोरोनाचा संसर्ग वाढत असून भडारा जिल्हा टास्क फोर्सने अधिक सतर्क आणि सज्ज राहण्याची आवश्यकता आहे. वाढता प्रादूर्भाव रोखण्यासाठी सर्व यंत्रणांनी आप आपसात समन्वय ठेवून सकारात्मक वृत्तीने हा लढा लढण्याची वेळ आहे. या लढयात डॉक्टर्स, पालीस, प्रशासनातील अधिकारी कर्मचारी व पालीका प्रशासन या फ्रंटलाईन वर्करची भुमिका अतिशय महत्वाची असून कोरोना विरूध्दच्या लढयात नागरिकांनी प्रशासनाला सहकार्य करावे, असे आवाहन जिल्हाधिकारी संदीप कदम यांनी केले. भंडारा जिल्हा टास्क फोर्स समितीची बैठक जिल्हाधिकारी कार्यालयात घेण्यात आली त्यावेळी ते बोलत होते.

---------------------------------------------

वर्धा इथल्या महात्मा गांधी आंतरराष्ट्रीय हिंदी विश्वविद्यालयाचे कुलगुरु प्रो. रजनीश कुमार शुक्ल यांनी उत्तरप्रदेशचे मुख्यमंत्री योगी आदित्यनाथ यांच्याशी विश्वविद्यालयातील अकादमिक कार्यक्रम, संचालित नवोन्मेषी अभ्यासक्रम आणि केंद्रांच्या विकासा संदर्भात मुख्यमंत्री निवासस्थानी चर्चा केली. या चर्चेत प्रो. शुक्ल

यांनी वैश्विक स्तरावर हिंदीचे संवर्धन व प्रचार-प्रसाराकरिता विश्वविद्यालयाच्या वतीने चालविण्यात येत असलेले अभ्यासक्रम तसेच प्रयागराज आणि कोलकाता क्षेत्रीय केंद्रांवरील कार्यपद्धतीची माहिती मुख्यमंत्री योगी यांना दिली. योगी आदित्यनाथ यांनी प्रो. शुक्ल यांच्या नेतृत्वात विश्वविद्यालयाच्या वतीने सुरू असलेल्या कार्यक्रमांची प्रशंसा केली.

---------------------------------------------

जागतिक बाजारातल्या मिश्र स्थितीच्या पार्श्वभूमीवर मुंबई शेअर बाजारातल्या गेल्या दोन सत्रांमधल्या घसरणीला आज लगाम बसला,आणि निर्देशांक **60** अंकांनी वधारून **38** हजार **417** अंकांवर बंद झाला.

राष्ट्रीय शेअर बाजाराचा निफ्टी आज **21** अंकांनी वधारला आणि **11**हजार **355** अंकांवर बंद झाला. डॉलरच्या रुपया आज **21** पैशांनी कमकुवत झाला आणि त्याचं मूल्य **73** रुपये **35** पैसे प्रति डॉलर इतकं झालं.

---------------------------------------------

राज्यातील आरोग्य विज्ञान पदवी अभ्यासक्रमांच्या प्रवेशामध्ये **70** टक्के प्रादेशिक कोटा आणि **30** टक्के राज्यस्तरिय कोटा या धर्तीवर यापूर्वी प्रवेश करण्यात येत होते. मात्र आता **70 : 30** प्रादेशिक कोटा कार्यपद्धत रद्द करण्यात आली असल्याने ‘वन महाराष्ट्र, वन मेरिट’ अशी वैद्यकीय प्रवेश प्रक्रिया असेल, अशी घोषणा वैद्यकीय शिक्षण मंत्री अमित विलासराव देशमुख यांनी विधानसभेत केली.

यापूर्वी उर्वरित महाराष्ट्र, मराठवाडा आणि विदर्भ असे तीन प्रादेशिक विभाग करण्यात आलेले होते, ज्या प्रादेशिक विभागातून उमेदवार **12** वी उत्तीर्ण झालेला असेल त्या उमेदवारांसाठी त्यांच्या संबंधित प्रादेशिक विभागातील महाविद्यालयामध्ये **70** टक्के जागा राखीव असायची . तसेच **30** टक्के जागा ह्या संपूर्ण राज्यातील उमेदवारांकरिता उपलब्ध असायचे तीनही प्रादेशिक विभागामध्ये महाविद्यालयांची संख्या आणि पर्यायाने प्रवेशासाठी उपलब्ध जागांची संख्या भिन्न होत्या. त्यामुळे मराठवाड्यासारख्या प्रादेशिक विभागामध्ये जेथे महाविद्यालयांची संख्या कमी आहे, तिथल्या विद्यार्थ्यांना **70** टक्के प्रादेशिक जागांमध्ये कमी जागा उपलब्ध होत होत्या. त्यामुळे उच्च गुणवत्ता असूनही तिथल्या उमेदवारांना त्यांच्या पसंतीच्या महाविद्यालयात प्रवेश मिळत नव्हता. त्यामुळे **70:30** कोटा पद्धत ही गुणवत्ताधारक विद्यार्थ्यांवर अन्यायकारक असल्याने मराठवाड्यातील पालकांकडून आणि विद्यार्थ्यांकडून तसेच लोकप्रतिनिधींकडून ही कार्यपद्धती रद्द करण्याची वारंवार मागणी होत होती.

**----------------------------------------------**

बुलडाणा जिल्हयात काल रात्रीपासुन पावसाला सुरुवात झाली विजेच्या गडगडाटासह सोसाट्याचा वारा मोठ्या प्रमाणात सुरु असतांना पाऊस सुरु असतांना जिल्हयात विज पडल्याच्या घटना घडल्या ईलेट्रीक खांब वाकले ह्यामुळे विज वितरन कंपनीचे नुकसान होवुन बरेच वेळ विजपुरवठा खंडीत होता जिल्हयातील शेगाव, संग्रामपुर, तालुक्यात दुपारी जोरदार पाऊस पडला सद्यस्थितीत पडणाऱ्या पावसामुळे शेतातील पिक सोयाबिन, तुर,ज्वारी आदींचे मोठ्या प्रमाणावर नुकसान झाले आहे

**----------------------------------------------**

चंद्रपूरच्या महाराष्ट्र उद्योजकता विकास केंद्रातर्फे **10** वी पास व **18** वर्षे पूर्ण असलेल्या युवक-युवतींकरीता **10** ते **22** सप्टेंबर या कालवधीमध्ये ऑनलाइन उद्योजकता विकास प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करण्यात आले आहे.

सदर प्रशिक्षणात ऑनलाइन प्रवेश घेण्याकरीता इच्छुक युवक- युवतींनी उद्या **9** सप्टेंबर पर्यंत महाराष्ट्र उद्योजकता विकास केन्द्र, उद्योग भवन, दुसरा माळा, रेल्वे स्टेशन रोड, चंद्रपुर येथे संपर्क साधावा असं आवाहन संबंधित विभागाने केलं आहे

**---------------------------------------------**

विदर्भात कोरोनाचा संसर्ग झपाट्याने वाढतो आहे. बुलढाणा आरोग्य विभागाकडून प्राप्त माहितीनुसार मागील **24** तासातप्राप्त झालेल्या कोरोना अहवालांमध्ये तब्बल ***196*** रुग्णांचे अहवाल पॉझिटिव्ह असल्याचे निष्पन्न झाले आहे. कोरोना संसर्गित रुग्णांचा आजपर्यंतचा आकडा ***4191*** झाला असून सद्यस्थितीत जवळपास ***1050*** च्या वर रुग्णांवर उपचार सुरू आहेत.

नागपुरात आज आतापर्यंत ११२ व्यक्तींचे कोरोना चाचणी अहवाल पॉजिटीव्ह आले आहे त्यामुळे एकूण बाधितांचा आकडा ४१ हजार १३८ इतका झाला असून २८ हजार ६ शे ५८ रुग्णांणी आतापर्यंत कोरोनावर मात केली आहे. शहरात १ हजार ३८५ रुग्ण कोरोनामुळे दगावले आहेत.

नागपूरचे जिल्हाधिकारी रवींद्र ठाकरे यांना कोरोन विषाणूची लागण झाली आहे. त्यांनी काळ चाचणी केल्यावर अहवाल पॉजिटीव्ह आला असून त्यांना आजाराची लक्षणे अद्याप दिसून आलेली नाहीत.

**---------------------------------------------**

कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाचा नवम दीक्षांत समारंभ आज संपन्न झाला.
विश्वविद्यालयाच्या इतिहासात प्रथमच कोविड 19 मुळे दीक्षांत समारोह जिओ मीट या आभासी माध्यमातून आयोजित करण्यात आला. आभासी दीक्षांत समारोह आयोजित करणारे कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालय हे भारतातील पहिले संस्कृत विश्वविद्यालय आहे, हे विशेष!
या दीक्षांत समारोहात संस्कृत क्षेत्रा आणि शिक्षणक्षेत्राातील अतुलनीय योगदानाबद्दल भारतीय विश्वविद्यालय संघाचे पूर्वाध्यक्ष आणि कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाचे पूर्वकुलगुरू डॉ. पंकज चांदे यांना तर योगशास्त्राातील संशोधन व सातत्यपूर्ण सेवेबद्दल श्री ओम प्रकाश तिवारी, सचिव कैवल्यधाम योग संस्था, लोणावळा, पुणे यांना मानद विद्यावाचस्पती अर्थात् **Honorary D.Litt.** उपाधीने सन्मानित करण्यात आले.

महाराष्ट्राचे राज्यपाल आणि विश्वविद्यालयाचे कुलपती श्री. भगतसिंग कोश्यारी यांनी या दीक्षांत समारोहात 271 पदव्युत्तर पदवी, 628 पदवी, 879 पदविका, 86 पदव्युत्तर पदविका, व 35 प्रमाणपत्रा अशी एकूण 1956 पदवी प्रमाणपत्रो प्रदान केली

स्वामी रामदेवजी आपल्या दीक्षांत भाषणात म्हणाले, ‘‘संस्कृत केवळ भाषा नसून ती एक संस्कृती आहे. भाषा, साहित्य, वेदविद्या, दर्शनादि विविध शास्त्रो संस्कृतमध्ये आहे. परा-अपरा विद्या, प्रवृत्ती-निवृत्ती, प्रेयस्-श्रेयस् या सर्वांचे सार संस्कृत भाषा आहे. अभियांत्रिकी, चिकित्साशास्त्रा, व्यवस्थापनशास्त्रा इ. विविध तंत्राविषय संस्कृतमधून शिकविण्यास प्रारंभ केला पाहिजे असे आवाहन स्वामी रामदेवजी यांनी केले.’’

या दीक्षांत समारोहाच्या अध्यक्षस्थानी कुलपती श्री. भगतसिंग कोश्यारी उपस्थित होते. प्रमुख अतिथी कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाचे पूर्व कुलगुरू डॉ. पंकज चांदे आणि योगप्रसारक ओमप्रकाश तिवारी, सचिव, कैवल्यधाम, लोणावळा, पुणे विश्वविद्यालयाचे कुलगुरू . प्रो. श्रीनिवास वरखेडीयाप्रसंगी विशेषत्वाने आभासी माध्यमातून उपस्थित होते.

---------------------------------------------

राज्यात काल दिवसभरात १४ हजार ९२२ रुग्ण कोरोनामुक्त होऊन घरी परतले. यामुळे राज्यात आत्तापर्यंत कोरोनामुक्त झालेल्या रुग्णांची एकूण संख्या ६ लाख ५९ हजार ३२२ झाली आहे. याबरोबरच राज्यातला कोरोनाबाधित रुग्ण बरे होण्याच्या दरात, पुन्हा वाढ होऊन तो ७१ पूर्णांक ३८ शतांश टक्के झाला आहे, अशी माहिती आरोग्य मंत्री राजेश टोपे यांनी दिली.राज्यात काल १६ हजार ४२९ नव्या कोरोनाबाधित रुग्णांचीही नोंद झाली. यामुळे राज्यातल्या कोरोनाबाधित रुग्णांची एकूण संख्या ९ लाख २३ हजार ६४१ झाली आहे.

राज्यात काल ४२३ कोरोनाबाधित रुग्णांच्या मृत्यूचीही नोंद झाली. यामुळे राज्यातल्या कोरोनाबाळींची एकूण संख्या २७ हजार २७ झाली आहे. सध्या राज्यात एकूण २ लाख ३६  हजार ९३४ कोरोनाबाधित रुग्णांवर उपचार सुरु आहेत.

---------------------------------------------